**अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत विशेष शिक्षकांच्या नियुक्ती प्रकरणा बाबत झालेल्या गैरव्यवहार अनियमितते प्रकरणी चौकशी समिती गठीत करणे बाबत. .**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
**शासन निर्णय क्रमांक :असयो-२०२२/प्र.क्र.८४/एस.डी-१**

मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १३ मे, २०२२

**प्रस्तावना:-**

श्री. नागोराव गाणार, श्री प्रविण दरेकर, ॲड निरंजन डावखरे, श्री. विजय उर्फ भाई गिरकर,विधान परिषद सदस्य यांनी अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत करण्यात आलेल्या विशेष शिक्षकांच्या नियुक्ती बाबत झालेल्या गैरव्यवहार व अनियमितते प्रकरणी सन २०२२ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात विधानपरिषद नियम ९३ सूचना उपस्थित केली होती. सदर सूचना दिनांक २२/०३/२०२२ रोजी सभागृहात चर्चेला आली असता, सन्माननीय विधानपरिषद सदस्य यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नाला उत्तर देताना मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांनी “सन्माननीय सदस्यांनी जी पत्राद्वारे तक्रार केली त्याबाबत सचिवांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करुन १५ दिवयाच्या आत चौकशी करण्यात येईल”, असे आश्वासन दिले आहे. मा. मंत्री शालेय शिक्षण यांनी दिलेले उपरोक्त आश्वासनाच्या अनुषंगाने चौकशी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

अपंग समावेशित शिक्षण योजना (माध्यमिक स्तर) अंतर्गत विशेष शिक्षकांच्या नियुक्ती बाबत करण्यात आलेल्या कार्यवाहीमध्ये झालेल्या गैरव्यवहार व अनियमितता प्रकरणी श्री रनजीत सिंह देओल, सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे चौकशी समिती गठीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| ३.अ.क्र. | नाव | पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|---|
| १. | श्री रनजीत सिंह देओल | सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | अध्यक्ष |
| २. | श्री.सूरज मांढरे | आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ३. | श्री. कैलास पगारे | राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई. | सदस्य |
| ४. | श्री. इम्तियाज काझी | सहसचिव तथा सहसंचालक (प्रशासन), समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई | सदस्य |
| ५. | श्री. गो.शि. तुंगार | सहसचिव (विधी), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | सदस्य |
| ६. | श्री. दिनकर टेमकर | शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ७. | श्री. संतोष गायकवाड | अवर सचिव (एस.डी.-१) | सदस्य सचिव |

३. सदर समितीची कार्यकक्षा ही खालीलप्रमाणे राहील :-

१) सन्माननीय विधानपरिषद सदस्यांनी उपस्थित केलेल्या नियम ९३ अन्वये सूचना क्र. १४ व त्यामध्ये उल्लेख केलेल्या दिनांक १४/०३/२०२२ रोजीच्या निवेदनामधील मुद्दे व त्यासोबत सादर केलेली कागदपत्रे विचारात घेऊन सदर प्रकरणी अनियमितता/गैरव्यवहार झाला आहे किंवा कसे याबाबत तपासणी करावी व त्याचा अहवाल स्वयंस्पष्ट अभिप्रायांसह शासनास सादर करावा.

२) सदर योजनेची परिणामकारक अंमलबजावणी करणे व याजनेतील दोष दूर करण्यासाठी उपपायोजना करणे याबाबत शिफारशी सादर करणे.

४. सदर समितीला संबंधित अधिकारी व कर्मचारी यांनी आवश्यक ते सहकार्य करावे तसेच आवश्यक त्या नस्त्या,कागदपत्रे व दस्तऐवज उपलब्ध करून द्यावे. सदर समितीने आवश्यकते प्रमाणे बैठका आयोजित करून/सुनावणी घेवून, उपलब्ध नस्त्यांची तपासणी करून दोन महिन्याच्या आत त्यांचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१३१७५७२०६८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, pseudonym=9D437DB3701DE5FE5D194241FCB9D73DC26031B1, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2022.05.13 17:58:56 +05'30'

**( प्रमोद पाटील )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई यांचे खाजगी सचिव
३) मा.सभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई यांचे खाजगी सचिव
६) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७) सर्व मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, विधानभवन,मुंबई
८) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई
९) मा. सचिव, शालेय शिक्षण विभाग
१०) मा. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे १.
१३) विभागीय शिक्षण उपसंचालक,सर्व
१४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने)
१५) निवडनस्ती (कार्यासन- एसडी-१)